जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत टेंबवली व ९ गावे, ता.देवगड, जि. सिंधुदुर्ग येथील प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा - २०२३/प्र.क्र.५०२/पापु १०**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१

**दिनांक:** १०/०७/२०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांक जजमि-२०१९/प्र.क्र.१३८/पापु-१० (०७), दिनांक ०४ सप्टेंबर, २०२०.
२) शासन निर्णय क्रमांक जजमि-२०१९/प्र.क्र.१३८ (भाग-२)/पापु-१०, दिनांक १० मार्च, २०२१.
३) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे मुळ तांत्रिक मान्यता आदेश, दिनांक **१०.१०**.२०१८
४) शासन निर्णय क्रमांक : ग्रापापु १४१८/प्र.क्र. २७१/पापु-**०६**, दिनांक ३१ जानेवारी २०१९
५) शासन पत्र क्र. ग्रापापु-**१४२०/**प्र.क्र. **१४८**/पापु-**०६** दि. २६.१०.२०२०
६) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश, दिनांक **१६.१०**.२०२३
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे पत्र मजीप्रा/मु.अ./ठाणे/तांशा-०१/२२६१, दिनांक १६.१०.२०२३.

**प्रस्तावना :-**

टेंबवली व ९ गावे ता. देवगड जि. सिंधुदुर्ग प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेस केंद्र शासन राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र. ४ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे. संदर्भ क्र. ३ अन्वये अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे (कोकण विभाग) यांनी मुळ अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तसेच, संदर्भाधीन क्र. ५ येथील शासनपत्रान्वये योजनेच्या जादा दराच्या निविदा स्वीकृतीस मान्यता देण्यात आली आहे. जादा दराची निविदा स्वीकृती, वस्तु व सेवा कराच्या दरामध्ये वाढ, योजनेच्या व्याप्तीमध्ये बदल, कलम ३८ इत्यादी कारणांमुळे योजनेच्या किंमतीमध्ये वाढ झाल्याने टेंबवली व ९ गावे, ता. देवगड, जि. सिंधुदुर्ग प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या रु. ६२८.१५ लक्ष (ढोबळ किंमत) इतक्या रक्कमेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र. ७ अन्वये मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांनी शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

मौजे टेंबवली व ९ गावे ता. देवगड जि. सिंधुदुर्ग योजनेस संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. उक्त शासन निर्णयान्वये सदर योजनेच्या रु. ५९७.६३ लक्ष इतक्या ढोबळ किंमतीस राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. जादा दराची निविदा स्वीकृती, वस्तु व सेवा कराच्या दरामध्ये वाढ व इतर

तांत्रिक बदल इत्यादी कारणांमुळे योजनेच्या किंमतीमध्ये वाढ झाल्याने टेंबवली व ९ गावे, ता. देवगड, जि. सिंधुदुर्ग प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या रु. ६२८.१५ लक्ष (रुपये सहाशे अठ्ठावीस लक्ष पंधरा हजार फक्त ) (ढोबळ) एवढ्या वाढीव किंमतीस पुढील अटींच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

## अटी

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे जल जीवन मिशन कार्यक्रमाच्या विहीत कालमर्यादेत पूर्ण होतील याची जबाबदारी मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांची राहील .
२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित मुख्य/कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व संबंधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषदेचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.
४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.
५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद ) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.
६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत / जिल्हा परिषद यांची राहील.
७. हागणदरीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.
८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.
९. या योजनेस मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
१०. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्रगतीपथावरील /अपूर्ण C-३९ योजनांच्या अनुषंगाने शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

०२. या योजनेच्या किंमतीतील वाढीव निधी रु. ३०.५२ लक्ष हा जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०७०८१३०३३११४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.07.10 10:43:51 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई..
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.
४) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग.
८) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१०) अभियान संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, ठाणे.
१२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
१३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
१४) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१५) वरिष्ठ भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सिंधुदुर्ग.
१६) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, सिंधुदुर्ग.
१७) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२०) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२१) कार्यासने (पापु-०४ व २०), पा. पु. व स्व.वि., मंत्रालय,मुंबई-३२.
२२) निवड नस्ती कार्यासन पापु-१०.